**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील “वैद्यकीय अधिकारी” यांना विशेषज्ञ संवर्गातील “अस्थिव्यंगोपचार तज्ञ” या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन आदेश क्रमांकः पदोन्न-१११९/प्र.क्र.३०४/सेवा-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार संकुल इमारत १० वा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: २९ मे, २०२०

**वाचा –** सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्रमांक-बीसीसी-२०१७/प्र.क्र. ३१२ अे/१६-ब, दि.२९.१२.२०१७

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील खालील वैद्यकीय अधिकारी (वेतन स्तर एस-२० : ५६१००-१७७५००) यांना विशेषज्ञ संवर्गातील अस्थिव्यंगोपचार तज्ञ (वेतन स्तर एस-२३: ६७७००-२०८७००) या पदावर या आदेशाद्वारे विहित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून, पदोन्नती कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. प्रस्तुत पदोन्नतीनंतर संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदस्थापना खालील विवरणपत्रामधील “स्तंभ-४” मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्यांचे नाव व सध्याची पदस्थापना | मूळ प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | डॉ. श्रीकांत गोविंद इंदूरकर, वैद्यकीय अधिकारी,सामान्य रूग्णालय, वर्धा. | खुला | अस्थिव्यंगोपचार तज्ञ, डागा स्मृती शासकीय रूग्णालय, नागपूर. (रिक्तपदी) |
| २. | डॉ. मनोजकुमार बा. राऊत, वैद्यकीय अधिकारी, केटीएस रूग्णालय, गोंदिया. | अ.जा. | अस्थिव्यंगोपचार तज्ञ, सामान्य रूग्णालय, वाशिम. (रिक्तपदी) |
| ३. | डॉ. विक्रम एम. आळंगेकर, वैद्यकीय अधिकारी, ग्रामीण रूग्णालय, उमरगा, जि.उस्मानाबाद. | खुला | अस्थिव्यंगोपचार तज्ञ, सामान्य रूग्णालय, उस्मानाबाद. (रिक्तपदी) |
| ४. | डॉ. भगवान रामजी पुंडगे, वैद्यकीय अधिकारी,ग्रामीण रूग्णालय, भोकर, जि. नांदेड. | अ.जा. | अस्थिव्यंगोपचार तज्ञ, सामान्य रूग्णालय, हिंगोली. (डॉ. टेहरे यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदी) |
| ५. | डॉ. भगवान तु. धुतमल, वैद्यकीय अधिकारी, पोलीस रूग्णालय, परभणी. | अ.जा. | अस्थिव्यंगोपचार तज्ञ, सामान्य रूग्णालय, बीड. (रिक्तपदी) |

| अ.क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्यांचे नाव व सध्याची पदस्थापना | मूळ प्रवर्ग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| ६. | डॉ. प्रताप जनार्दन घोडके,<br>वैद्यकीय अधिकारी, सामान्य रूग्णालय, जालना. | खुला | अस्थिव्यंगोपचार तज्ञ,<br>सामान्य रूग्णालय, जालना.<br>(डॉ. म्हस्के यांच्या बदलीने रिक्त झालेल्या पदी) |
| ७. | डॉ. विलास आर. साळवे,<br>वैद्यकीय अधिकारी,सामान्य रूग्णालय, ठाणे. | अ.जा. | अस्थिव्यंगोपचार तज्ञ,<br>सामान्य रूग्णालय, खामगाव,<br>जि. बुलढाणा. (रिक्तपदी) |
| ८. | डॉ. विठ्ठल नामदेवराव तिडके,<br>वैद्यकीय अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी. | भ.ज.<br>(क) | अस्थिव्यंगोपचार तज्ञ,<br>सामान्य रूग्णालय, शेगाव.<br>(रिक्तपदी) |

३. सदर पदोन्नती विशेषज्ञ संवर्गातील "अस्थिव्यंगोपचार तज्ञ" या पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार देण्यात येत आहे.

४. मा. उच्च न्यायालयाने पदोन्नतीचे आरक्षण रद्द करण्यासंदर्भातील याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरूद्ध राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केलेली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याअनुषंगाने सा. प्र. विभागाने दि.२९.१२.२०१७ च्या पत्रान्वये तूर्तास पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावी व अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी / कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दि.२५.०५.२००४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा मार्गदर्शक सूचना दिल्या आहेत. त्यानुसार सदर पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

५. सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

६. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात असून सदर पदावर संबंधितांचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही. तसेच सदर पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यास नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

७. पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीनंतर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा, असा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती, महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११(१)(ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

८. संबंधित अधिकाऱ्यांना त्यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेवर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी एक महिन्याच्या आत हजर होऊन, त्याबाबतचा अहवाल उपसंचालक, आरोग्य सेवा, संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांना व शासनास सादर करावा. पदस्थापना बदलून घेण्यासाठी राजकीय दबाव आणल्यास सदर कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदीनुसार शिस्तभंग विषयक कारवाईस पात्र ठरेल.

९. पदोन्नती दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेवर विहित मुदतीत हजर व्हावे. जे अधिकारी विहित मुदतीत पदोन्तीवर हजर होणार नाहीत ते पदोन्नतीस इच्छुक नाहीत असे गृहीत धरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच त्यांना देण्यात आलेला आश्वासीत प्रगती योजनेचा लाभ काढून घेण्यात येईल. तसेच, अधिकाऱ्यांनी पदोन्नती न स्विकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल. या प्रकरणी संबंधीत उपसंचालक यानी संबंधीत अधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्यानंतर नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी वेळीच हजर होतात किंवा नाही याबाबतचा अनुपालन अहवाल विहित कालमर्यादेत शासनास सादर करावा.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५२९११३९४९७७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vishnudas Pundlikrao Ghodke

Digitally signed by Vishnudas Pundlikrao Ghodke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=514c2e5ad6ac71c69b99a86a5fe5189556b7a95d5896bbb81496f403bb58ac3e, serialNumber=9ab69d6945f8950a9525831f8ae9726be295d17576e78d19fa8f6cb952bb04a0, cn=Vishnudas Pundlikrao Ghodke
Date: 2020.05.29 12:26:45 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, महाराष्ट्र लोक सेवा आयोग, मुंबई (पत्राने)
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
४. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
६. सह संचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई
७. उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
८. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१२. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१३. मा. मंत्री (आरोग्य)/मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२ व १६-ब, मंत्रालय, मुंबई
१५. प्रधान सचिव (सा.आ.) यांचे स्विय सहायक
१६. सर्व सह सचिव/उप सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. सर्व संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे मार्फत)
१९. निवडनस्ती सेवा-२